गट-अ आणि गट-ब (राजपत्रित) संवर्गातील सर्व अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल “महापार” या संगणक प्रणालीत नोंदविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएफआर-१२१७/प्र.क्र.१३१/तेरा**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०६ जून, २०१८

वाचा : १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. सीएफआर - १२१०/प्र.क्र.४७/२०१०/तेरा, दि. १/११/२०११
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : सीएफआर-१२११/प्र.क्र.२५७/तेरा, दि. २/२/२०१७
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : सीएफआर-१२११/प्र.क्र.२५७/तेरा, दि. ७/२/ २०१८

**प्रस्तावना :**

शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल लिहिणे व जतन करणे याबाबत शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. सीएफआर - १२१०/प्र.क्र.४७/२०१०/तेरा,दि. १ नोव्हेंबर,२०११ नुसार एकत्रित सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्याचप्रमाणे दि.२.२.२०१७ च्या शासन निर्णयान्वये “गट-अ” संवर्गातील शासकीय अधिकाऱ्यांचे मूल्यमापन करण्यासाठी “कार्यमूल्यमापन अहवालाचा” सुधारीत नमुना निश्चित करण्यात आला असून सन २०१६-१७ या प्रतिवेदन वर्षापासून १२ सेवेतील निवडक गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल “महापार” (MahaPAR) या संगणक प्रणालीद्वारे लिहीण्यात येत आहेत.

महापार या प्रणालीचा पहिला टप्पा सन २०१६-१७ या वर्षामध्ये यशस्वीरित्या कार्यान्वित झाला असून आता पुढील टप्प्यामध्ये सर्व राजपत्रित अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल “महापार” (MahaPAR) या संगणक प्रणालीद्वारे नोंदविण्याचा निर्णय दि. ७.२.२०१८ रोजी शासनाने घेतलेला आहे. या शासन निर्णयात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती त्यानुसार शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय -**

शासन निर्णय, दि. ७.२.२०१८ अन्वये घेण्यात आलेल्या निर्णयात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

क) खालील १२ सेवेतील सर्व गट-अ आणि गट-ब (राजपत्रीत) संवर्गातील राज्य शासकीय अधिकाऱ्यांचे सन २०१७-१८ या प्रतिवेदन वर्षापासूनचे कार्यमूल्यमापन अहवाल महापार या प्रणालीत ऑनलाईन पद्धतीने नोंदविण्यात यावेत.

ख) निवडक १२ सेवेतील अधिकारी वगळता अन्य सेवेतील गट-अ आणि गट-ब (राजपत्रित) संवर्गातील सर्व अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल सन २०१७-१८ या प्रतिवेदन वर्षासाठी

ऑफलाईन पध्दतीने आणि दि. ७.२.२०१८ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या सुधारित नमुन्यात लिहिण्यात यावेत.

ग) खालील १२ सेवेतील गट-अ आणि गट-ब (राजपत्रित) संवर्गातील जे राज्य शासकीय अधिकारी प्रतिनियुक्तीने कार्यरत आहेत त्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल सन २०१७-१८ या वर्षासाठी ऑफलाईन पध्दतीने लिहिण्यात यावेत.

| अ.क्र. | सेवा | प्रशासकीय विभाग |
|---|---|---|
| १ | मंत्रालय | सामान्य प्रशासन विभाग |
| २ | राज्य कर | वित्त विभाग |
| ३ | लेखा व कोषागारे | वित्त विभाग |
| ४ | महसूल | महसूल व वन विभाग |
| ५ | वने | महसूल व वन विभाग |
| ६ | भूमी अभिलेख | महसूल व वन विभाग |
| ७ | पोलीस | गृह विभाग |
| ८ | परिवहन | गृह विभाग |
| ९ | उत्पादन शुल्क | गृह विभाग |
| १० | सहकार | सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| ११ | शालेय शिक्षण | शालेय शिक्षण विभाग |
| १२ | महाराष्ट्र विकास सेवा | ग्रामविकास विभाग |

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८०६०६१२०५४६९००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil R Joshi

Digitally signed by Sunil R Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed693ebe82bd686692d8928353155 78f33ccb3e0629da8fc85869c852933fb68, cn=Sunil R Joshi
Date: 2018.06.06 13:07:59 +05'30'

**( सु. रा. जोशी )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राने)
४. *प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई, (पत्राने)
५. *प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई /नागपूर/औरंगाबाद खंडपीठ (पत्राने)
६. *प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई /नागपूर/औरंगाबाद खंडपीठ (पत्राने)
७. मा.अध्यक्ष,महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव
८. मा.सभापती,महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव.
९. सर्व विधान सभा/विधान परिषद सदस्य,महाराष्ट्र विधानमंडळ

१०. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
११. *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा)मुंबई.
१२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई
१३. विभागीय आयुक्त (सर्व)/जिल्हाधिकारी (सर्व जिल्हे)
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व)
१५. विधानमंडळ ग्रंथालय,विधान भवन,मुंबई.
१६. सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख/ प्रादेशिक विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख
१७. अवर सचिव-कार्या-१२ / १४ सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना)
१९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई-४०००३२.
२०. निवडनस्ती,कार्यासन-१३,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई-४०००३२.